सहायक पोलीस अधीक्षक संवर्गाची दहा अधिसंख्य पदे निर्माण करणेबाबत. परिवीक्षाधीन भारतीय पोलीस सेवा अधिकारी -७३ वी तुकडी.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:-आयपीएस/प्र.क्र.४२४/ पोल-१,**
२ रा मजला, मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.
दिनांक :- ०७ जानेवारी २०२२

**संदर्भ** :-अपर पोलीस महासंचालक (प्रशिक्षण व खास पथके), महाराष्ट्र राज्य यांचे पत्र क्र. प्रशि-२/ परि.भापोसे ७३ आर आर. बॅच-२०२०/५९/२०२१-३१५७, दिनांक १३ डिसेंबर २०२१.

**प्रस्तावना :-**

भारतीय पोलीस सेवेच्या ७३ व्या तुकडीतील दहा परिवीक्षाधीन अधिकाऱ्यांना महाराष्ट्र राज्यात प्रशिक्षण घेण्याकरिता, ते महाराष्ट्र राज्यात परिवीक्षाधीन म्हणून रुजू झाल्याच्या दिनांकापासून ते Phase-II चे प्रशिक्षण कालावधीकरिता, म्हणजेच दि.२०.१२.२०२१ ते दि.०७.१०.२०२२ पर्यंत "सहायक पोलीस अधीक्षक" संवर्गाची दहा अधिसंख्य पदे निर्माण करण्याबाबतचा प्रस्ताव अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी सादर केला आहे. त्यास अनुलक्षून शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.:-

**शासन निर्णय :-**

भारतीय पोलीस सेवेच्या ७३ व्या तुकडीतील, खालील तक्त्यात नमूद केलेल्या १० परिवीक्षाधीन अधिकाऱ्यांकरीता दि.२०.१२.२०२१ ते दि.०९.७.२०२२ या कालावाधीकरिता जिल्हा प्रात्यक्षिक प्रशिक्षण आयोजित करण्यात आले आहे. त्यानंतर त्यांचे, दि.१८.७.२०२१ ते दि.०७.१०.२०२२ या कालावधीत सरदार वल्लभभाई पटेल राष्ट्रीय पोलीस अकादमी, हैद्राबाद येथे Phase -II चे प्रशिक्षण आयोजित केले असल्याने, दि.२०.१२.२०२१ ते दि.०७.१०.२०२२ या कालावधीसाठी परिवीक्षाधीन "सहायक पोलीस अधीक्षक" या संवर्गातील दहा अधिसंख्य पदे निर्माण करण्यास आणि त्यासाठी त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या जिल्ह्यात प्रशिक्षण कालावधीसाठीचे वेतन व भत्ते यासाठी होणारा खर्च करण्यास, याद्वारे, शासन मंजुरी देण्यात येत आहे.

| अ. क्र. | प्रशिक्षणार्थी भापोसे अधिकारी यांचे नाव | जिल्हा |
|---|---|---|
| १. | श्री. देशमुख अभयसिंह बाळासाहेब | लातूर |
| २. | श्री. गोकुल राज जी. | कोल्हापूर |
| ३. | श्री.कांबळे आशित नामदेव | जळगांव |
| ४. | श्रीम. महक स्वामी | वाशिम |
| ५. | श्रीम. नितिपुडी रश्मिता राव | बीड |
| ६. | श्री. पंकज अतुलकर | औरंगाबाद (ग्रामीण) |

| | | |
|---|---|---|
| ७. | श्री. सिंगा रेड्डी ह्रषिकेश रेड्डी | रत्नागिरी |
| ८. | श्री. तेगबिर सिंग संधु | पुणे (ग्रामीण) |
| ९. | श्री. एम.व्ही. सत्य साई कार्तिक | सोलापूर (ग्रामीण) |
| १०. | श्रीम. शफकत आमना | वर्धा |

२. उक्त परिवीक्षाधीन भापोसे अधिका-यांचे वेतन हे सध्या ज्या जिल्ह्याच्या आस्थापनेवर त्यांची प्रशिक्षणाकरिता नियुक्ती करण्यात आली आहे, त्याच जिल्ह्याच्या आस्थापनेवर काढण्यात येईल. उपरोक्त १० परिविक्षाधीन अधिकाऱ्यांच्या वेतन व भत्यासाठी होणारा खर्च हा गृह विभाग-मागणी क्र. "बी-१, २०५५, पोलीस, ००,१०९, जिल्हा पोलीस (००) (००) (०१) जिल्हा पोलीस बल (२०५५०१६८) दत्तमत (अनिवार्य),०१-वेतन" या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ व सन २०२२-२३ या वित्तीय वर्षामध्ये उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, शा. नि., वित्त विभाग, क्र. पदनि २०१२/ प्र.क्र.६६/ १२/ वित्तीय सुधारणा-१, दिनांक ११ जुलै, २०१२, अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१११११९०१४०३२२९ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWAPNIL GOPAL BORSE

Digitally signed by SWAPNIL GOPAL BORSE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c6a6e7cad855fc787a96e36f11fbc87a9f66cfd9bad01184493f2735ad885627, pseudonym=E15DEDF011CBE07295FC54DEC7494CDD2EBE3FA9, serialNumber=8538CD1E408948F7D025537D5F6589BD8958D1B95322E66D2CC5EDF89AD0D79E, cn=SWAPNIL GOPAL BORSE
Date: 2022.01.11 19:03:32 +05'30'

**(स्वप्निल गोपाल बोरसे)**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन,**
**गृह विभाग.**

**प्रति,**

१. महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. पोलीस अधीक्षक, लातूर/ कोल्हापूर/ जळगांव/वाशिम/ बीड/औरंगाबाद ग्रामीण/ रत्नागिरी/ पुणे ग्रामीण/सोलापूर ग्रामीण/ वर्धा.
४. संबंधित परिवीक्षाधीन भापोसे अधिकारी (महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेमार्फत.)

**प्रत:-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर.
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
४. जिल्हा कोषागार अधिकारी, लातूर/ कोल्हापूर/जळगाव/वाशिम/ बीड/ औरंगाबाद/ रत्नागिरी/पुणे/ सोलापूर/वर्धा.
५. सह संचालक (तांत्रिक), लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, मुंबई (२ प्रती).
६. वित्त विभाग (व्यय-७/वित्तीय सुधारणा-१), मंत्रालय, मुंबई.
७. सहायक संचालक, भापोसे कक्ष, गृह विभाग, २ रा मजला, मंत्रालय, मुंबई.
८. कार्यासन अधिकारी, कार्यासन अर्थसं-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवड फाईल.(कार्यासन पोल-१).